**मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांची खंडपीठे येथे दाखल झालेल्या प्रकरणात राज्य सहकारी निवडणूक झालेल्या प्रकरणात राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाची बाजू मांडण्यासाठी नियुक्त केलेल्या विधिज्ञांचे व्यावसायिक शुल्क अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं ०६१८/प्र.क्र.६०/१३-स**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा:-**

१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण,पुणे यांचे पत्र क्र.रासनिप्रा/निवडणूक/लेखा/कक्ष-१५/पावसाळी पुरवणी मागणी/३९३४/२०१८ दि.३१.५.२०१८
२) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे परिपत्रक क्र.पूरक २०१८/प्र.क्र.७७/अर्थसंकल्प-३ दि.२५.५.२०१८
३) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे पत्र क्र.पूरक २०१८/(३४/२०१८)/१७-स दि.२९.५.२०१८
४) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे परिपत्रक क्र.पूरक २०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३ दि.२७.७.२०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणामार्फत घेण्यात येतात. सदर निवडणूकांच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालय, मुंबई व खंडपीठ औरंगाबाद, नागपूर येथे प्राधिकरणाचे विरुध्द याचिका दाखल केल्या जातात. तसेच महाराष्ट्र सहकारी संस्था (समिती निवडणूक) २०१४ चे नियम ७८ अन्वये दाखल होणा-या निवडणूक विवादासाठी प्राधिकरणाने नियुक्ती केलेल्या अधिवक्त्यांना शासकीय दराने अनुज्ञेय असलेले वकील शुल्क अदा करण्यासाठी रु.१५,००,०००/- एवढया रकमेची पुरवणी मागणी जुलै २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात मान्य झाली असून, ती वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे यांच्या वतीने बाजू मांडण्यासाठी नियुक्त केलेले अधिवक्ता श्री. अभिजीत कापसे, श्री.शंतनू घाटे, श्री.मनोज पाटील, श्री. एस.के.कदम व श्री.अमित बोरकर या अधिवक्त्यांना त्यांनी सादर केलेल्या देयकांच्या अनुषंगाने वकील शुल्क अदा करण्यासाठी मान्य झालेल्या पुरवणी मागणीच्या ७० टक्के म्हणजेच रु.१०,५०,००० (रु.दहा लाख पन्नास हजार फक्त) एवढया रकमेस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रु.१०,५०,०००/- (रु.दहा लाख पन्नास हजार फक्त) एवढी रक्कम सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिका-यामार्फत वितरित करण्यात यावी. त्यासाठी सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

वकीलांचे व्यावसायिक शुल्कासाठी येणारा खर्च "२०७० इतर प्रशासकीय सेवा, (००)(८००)- इतर खर्च, (०० )(०१), राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (२०७००८८२) २८- व्यावसायिक सेवा "या लेखाशीर्षा खाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या पुरवणी मागणीच्या तरतुदीममधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग दोन अनुक्रमांक ४९ नियम क्र.१६६ अन्वये प्रशासकीय विभागांना असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४९७/ २०१८, व्यय-२, दि.१.१०.२०१८ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१०१५१२२४५१४४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2018.10.15 12:31:11 +05'30'

(अनिल चौधरी)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे.
२) मा.प्रधान सचिव, (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/नागपूर
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५) उपसचिव (व्यय-२) व (अर्थ -१३), मंत्रालय, मुंबई
६) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७) निवडनस्ती.